एस्टीतून उतरताच
तुला खूपच थकल्यासारखे वाटेल.
लगेच घरी जाऊन आराम करावा असेही.
जवळच वडिलांचे ऑफीस आहे.
तिथे जा. त्यांना वाकून नमस्कार कर.
त्यांना पुन्हा पुत्रप्राप्तीचा आनंद होईल.
घराच्या गल्लीच्या तोंडाशी
तुझी धाकटी बहीण मातीत खेळत असेल.
तिला रागावू नकोस,
तिचे मातीचे हात पँटला लागले म्हणून.
माडीवरून भाऊ तुला पाहील
आणि अंतरावरून न्याहाळत राहील
तुझे शहरीपण आणि त्याला आदर्शवत वाटणारे तुझे वागणे.
त्याला संध्याकाळी फिरायला न्यायला विसरू नकोस.
आत जाताना जरा जपूनच जा
आजी कसलेसे शिवणकाम घेऊन बसली असेल
नजरेतून सुई ओघळली
तर फाटलेले काहीतरी एकसारखे शिवत राहण्याचा तिचा उद्योग
थांबेल काही काळ.
इथली सारीच माणसे तिने कशी एकाच महिरपीत विणून ठेवली आ
चुलीशी आई भाकरी थापीत असेल,
तिच्याबरोबर रात्रीचे जेवण्यासाठी थांब.
जिच्यामुळे या घरात सुख आणि समाधान पाणी भरते,
ती तुझी आई, रात्री कित्येकदा
फक्त पाणी पिऊनच झोपी जाते
हे तुला ठाऊक असायला हवे.

तुझ्या सुट्टीतल्या घरी येण्याने सारे घरच आनंदीत, प्रफुल्लीत झालेले
घराच्या कुंपणावरून साऱ्यांच्याच नजरा
तुझ्या पावलांकडे लागलेल्या असतात.
तुझ्या पावलांसमोर फक्त आभाळच उरावे
असेच साऱ्यांना वाटत असते.

परत निघताना सगळ्या गोष्टी नीट ध्यानात ठेव
आणि
तुझे हे साधे सोज्वळ रूपही
वडिलांनी दिलेल्या पैशासारखे घरातच विसरून जा.

तुझ्यापेक्षा या घराला त्याची जास्त गरज आहे...



# कालनिर्णय

प्रकाशक, कलादिग्दर्शन, रेखाचित्र व अक्षरलेखन : भालचंद्र कुबल
कविता : प्रविण दामले

एस्टीतून उतरताच
तुला खूपच थकल्यासारखे वाटेल.
लगेच घरी जाऊन आराम करावा असेही.
जवळच वडिलांचे ऑफीस आहे.
तिथे जा. त्यांना वाकून नमस्कार कर.
त्यांना पुन्हा पुत्रप्राप्तीचा आनंद होईल.
घराच्या गल्लीच्या तोंडाशी
तुझी धाकटी बहीण मातीत खेळत असेल.
तिला रागावू नकोस,
तिचे मातीचे हात पॅंटला लागले म्हणून.
माडीवरून भाऊ तुला पाहील
आणि अंतरावरून न्याहाळत राहील
तुझे शहरीपण आणि त्याला आदेशित वाटणारे तुझे वागणे.
त्याला संध्याकाळी फिरायला न्यायला विसरू नकोस.
आत जाताना जरा जपूनच जा
आजी कसलेसे शिवणकाम घेऊन बसली असेल
नजरेतून सुई ओघळली
तर फाटलेले काहीतरी एकसारखे शिवत राहण्याचा तिचा उद्योग
थांबेल काही काळ.
इथली सारीच माणसे तिने कशी एकाच मळिरपीत विणून ठेवली आहेत
चुलीशी आई भाकरी थापीत असेल,
तिच्याबरोबर रात्रीचे जेवण्यासाठी थांब.
जिच्यामुळे या घरात सुख आणि समाधान पाणी भरते,
ती तुझी आई, रात्री कित्येकदा
फक्त पाणी पिऊनच झोपी जाते
हे तुला ठाऊक असायला हवे.

तुझ्या सुट्टीतल्या घरी येण्याने सारे घरच आनंदीत, प्रफुल्लीत झालेले.
घराच्या कुंपणावरून साऱ्यांच्याच नजरा
तुझ्या पावलांकडे लागलेल्या असतात.
तुझ्या पावलांसमोर फक्त आभाळच उरावे
असेच साऱ्यांना वाटत असते.

परत निघताना सगळ्या गोष्टी नीट ध्यानात ठेव
आणि
तुझे हे साधे सोज्वळ रुपडे
वडिलांनी दिलेल्या पैशासारखे घरातच विसरून जा.

तुझ्यापेक्षा या घराला त्याची जास्त गरज आहे...





कालनिर्णय

प्रकाशक, कलादिग्दर्शन, रेखाचित्र व अक्षरलेखन : भालचंद्र कुवल
कविता : प्रविण दामले